**राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन योजनेचा सन २०१८-१९ करिता निधी वितरीत करण्याबाबत.. (४४०६-००५३).**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०१८/प्र.क्र.३३९/फ-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक : ८ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा :-**

१) अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.१३/(००५३)/३२८/१८-१९, दिनांक २९.०५.२०१८.

२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अंर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २.०४.२०१८.

३) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ५.०६.२०१८.

४) शासन निर्णय क्र. एस-१०/२०१८/प्र.क्र.१४२/फ-३, दिनांक ११.०६.२०१८

५) अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.१३/(००५३)/११६५/१८-१९, दिनांक ३.१०.२०१८.

६) अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.१३/(००५३)/११६३/१८-१९, दिनांक ३.१०.२०१८.

**प्रस्तावना :**

राज्य योजनेअंतर्गत सन २०१८-१९ करिता राखीव वनांचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन यासंदर्भात उपशिर्ष (४४०६-००५३) योजनांतर्गत एकूण रु.१०००.०० लक्ष इतका नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेअंतर्गत संदर्भ क्र. ५ अन्वये पुणे वनवृत्तांतर्गत भांबुर्डा व पुणे वन परिक्षेत्रातील कात्रज व हांडेवाडी येथील प्रस्तावित आर.सी.सी. सिमाभिंत कामाकरिता रु.१०१.५० लक्ष तसेच संदर्भ क्र. ६ अन्वये पुणे वनवृत्तांतर्गत भांबुर्डा वन परिक्षेत्रातील मौजे भांबुर्डा, हिंगणे, पाचगांव पर्वती व मॅफको येथील येथील आर.सी.सी. सिमाभिंत कामाकरिताचा रु. १६९.०१ लक्ष असे **एकूण रु. २७०.५१ लक्ष** इतक्या रकमेचे अनुदान वितरीत करण्यासाठी शासनास विनंती केली आहे.

उपरोक्त २ प्रस्तावांपैकी मौजे कात्रज व हांडेवाडी येथील प्रस्तावित आर.सी.सी. सिमाभिंत कामाकरिता एकूण रु. १०१.५० लक्ष चे काम पुणे मनपाकडून प्राप्त झालेल्या अनुदानातून करण्याचे प्रस्तावित होते. त्यानुषंगाने मौजे कात्रज व हांडेवाडी येथील कामाच्या अंदाजपत्रकांस संदर्भ क्र. ४ च्या दोन स्वतंत्र शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. परंतू पुणे महानगर पालिका व वन विभाग, पुणे यांच्यामध्ये झालेल्या सामंजस्य करारनाम्यात पुणे वनविभागातील भांबुर्डा, पाचगांव पर्वती, वारजे, कोथरुड व धानोरी या पाच गावांचे सिमाभिंतीचा उल्लेख केला असून त्यामध्ये कात्रज व हडपसर (हांडेवाडी) या गावाचा समावेश नसल्यामुळे या २ गावांच्या सिमांभितीसाठी पुणे मनपाकडून निधी उपलब्ध होणार नसल्याचे कळविण्यात आले आहे. सबब, सदर २ गावांच्या कामाबाबतच्या प्रस्तावास राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी

व सिमांकन या योजनेअंतर्गत निधी उपलब्ध करुन देण्याबाबत अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासनास विनंती केली आहे.

वित्त विभागाच्या दिनांक २.०४.२०१८ रोजीच्या परिपत्रकानुसार, सन २०१८-१९ मध्ये प्रथम नऊ माहीकरिता आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमावरील खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० % निधीचे वितरण करण्याचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागांना प्रदान केले आहेत.

प्रकरणी अर्थसंकल्पित एकूण रु.१०००.०० लक्ष (०२ मजूरी- रु.१६९.६० लक्ष, लहान बांधकामे- रु.२१२.७५ लक्ष व ५३ मोठे बांधकामे - रु. ६१७.६५ लक्ष) निधी पैकी वित्त विभागाच्या उपरोक्त शासन निर्णयाच्या अधिन राहून ७० % निधी म्हणजेच रु. ७००.०० लक्ष निधी वितरण करता येईल. त्यापैकी आतापर्यंत संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये रु. १२३.५६ लक्ष निधी वितरीत करण्यात आला असून शिल्लक रु. ५७६.४४ लक्ष निधीतून प्रस्तावित पुणे वनवृत्तासाठी रु. २७०.५१ लक्ष इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:**

सन २०१८-१९ करिता "राखीव वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन" (४४०६ ००५३) या योजनेअंतर्गत एकूण रु.१०००.०० लक्ष अर्थसंकल्पीत निधीच्या मर्यादेत प्रस्तावांतर्गत पुणे वनवृत्तांतर्गत वन विभागातील वनजमिनीवर संरक्षक भिंत बांधकाम करण्याकरिता आवश्यक एकूण **रु. २७०.५१** लक्ष निधी (०२ मजूरी- रु.४५,९८ ६७०/- + २७ लहान बांधकामे रु. ५६,८०,७१०/- + ५३ मोठे बांधकामे रु. १,६७,७१,६२०/-) इतका निधी पुढील तपशिलानुसार तसेच अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

(रक्कम लाखात)

| अ.क्र. | वनवृत्त | विभागाचे नाव | कामाचा तपशिल | | वितरीत रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | **पुणे** | पुणे | मौजे कात्रज सर्व्हे क्र.३९ येथे आर.सी.सी. सिमाभिंत बांधणे ४७४ र.मी. | ४९.५० | १०१.५० |
| | | | मौजे हांडेवाडी सर्व्हे क्र. ६०/६५ येथे आर.सी.सी. सिमाभिंत बांधणे ४९८ र.मी. | ५२.०० | |
| २ | **पुणे** | पुणे | मौजे भांबुर्डा सर्व्हे क्र. ८१ येथे आर.सी.सी. सिमाभिंत बांधणे ६८४ र.मी. | ६४.१० | १६९.०१ |
| | | | मौजे हिंगणे सर्व्हे क्र. १७ येथे आर.सी.सी. सिमाभिंत बांधणे ६८७ र.मी. | ६४.३५ | |
| | | | मौजे पाचगांव पर्वती सर्व्हे क्र. ९५ येथे आर.सी.सी. सिमाभिंत बांधणे ३०० र.मी. | २८.२२ | |
| | | | मॅफको सर्व्हे क्र. ९६/९७ येथे आर.सी.सी. सिमाभिंत बांधणे ४९० र.मी. | १२.३४ | |
| | | | **एकूण** | | **२७०.५१** |

१) ज्या प्रयोजनासाठी खर्चास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनावर निधी खर्च करण्यात यावा.

२) यामध्ये कोणत्याही प्रकारची वित्तिय अनियमितता होणार नाही, याची पुरेपूर दक्षता घेण्यात यावी.

३) वित्त विभागाने दिनांक ११/७/२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या वित्तिय मर्यादा यापुढेही लागू राहतील.

४) सदर मान्यता ही सन २०१८-१९ या कालावधी करिताच देण्यात येत आहे.

सदर खर्च हा मागणी क्रमांक- सी-१०, ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च राज्य योजनांतर्गत योजना वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (४४०६-००५३) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०१८-१९ मध्ये मंजूर अर्थसंकल्पित अनुदानातून भागविण्यात यावा. निधी खर्च करताना वित्त विभागाने मासिक निधी विवरणपत्र तसेच इतर बाबतीत दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक २.०४.२०१८ रोजीचे परिपत्रक आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक वि.अ.प्र.-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७/४/२०१५ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१००८१६२०४८०४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2018.10.08 16:22:59 +05'30'

( वीरेंद्र तिवारी )
अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे.
५) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
६) उप वनसंरक्षक, पुणे
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.